**“सन २०१७ ते सन २०१९ या वर्षाच्या कालावधीमध्ये ५० कोटी वृक्ष लागवड, संगोपन आणि देखरेख” या कार्यक्रमांतर्गत सन २०१९ या वर्षाचा नियोजन आराखडा व कृती कार्यक्रम तयार करून अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.२२१/नवि-३४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १६ फेबुवारी, २०१९.

**वाचा:**

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१५/प्र.क्र.१३१/फ-११, दि. ३१.०३.२०१६
२. शासन निर्णय, संकीर्ण- २०१६/ प्र.क्र.६०/नवि-३४, दिनांक १७ मे, २०१६
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दि. १०.१०.२०१६
४. शासन निर्णय, संकीर्ण- २०१६/ प्र.क्र.६०/नवि-३४, दिनांक ६ मार्च, २०१७.
५. शासन निर्णय, संकीर्ण- २०१६/ प्र.क्र.६०/नवि-३४, दिनांक १ मार्च, २०१८.
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक: साववि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दि.६.९.२०१८

**प्रस्तावना :-**

जागतिक तापमानातील वाढ, हवामान आणि ऋतू बदल याची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी मोठया प्रमाणात वृक्ष लागवड हाती घेण्याचे महत्व वैश्विक स्तरावर मान्य झालेले आहे. या उपक्रमाचा भाग म्हणून संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये दि. १ जुलै, २०१६ रोजी एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वाकांक्षी आणि धडक कार्यक्रम शासनाने हाती घेतला होता. यामध्ये वन विभागासह नगर विकास विभाग व इतर शासकीय विभाग समाविष्ट झाले होते.

२. त्याचप्रमाणे दि. १ जुलै, २०१६ च्या कार्यक्रमामध्ये शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे, एन. एस. एस., एन. सी. सी., स्काऊट ॲन्ड गाईडस्, अशासकीय संस्था, स्वयंसेवी संस्था, सामाजिक क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या संस्था, औद्योगिक समूह, सीएसआर, लोकप्रतिनिधी, गृहनिर्माण संस्था, सहकारी संस्था, शासकीय कर्मचारी व अधिकारी इत्यादींचा देखील सहभाग संबंधित विभागांनी घेतला होता. त्या कार्यक्रमाचे नियोजन ते अंमलबजावणी व रोपांचे संरक्षण याबाबत वन विभागाने संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांसोबतच नगर विकास विभागांतर्गत क्षेत्रिय यंत्रणांनी करावयाची कार्यवाहीबाबत सविस्तर सूचना संदर्भ क्र. २ येथे नमूद शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या.

३. त्याच अनुषंगाने नगर विकास विभागाने सन २०१७ करीता संदर्भाधिन क्रमांक ४ येथील, दिनांक ६/३/२०१७ व सन २०१८ करीता संदर्भाधिन क्रमांक ५ येथील दिनांक १/३/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये वृक्ष लागवड, संगोपन आणि देखरेख या कार्यक्रमांतर्गत नगर विकास विभागातंर्गत

येणाऱ्या प्राधिकरणांना वृक्षारोपणाचे उद्दिष्टे देण्यात आले होते. आपल्या सर्वांच्या एकत्रित प्रयत्नामुळे हा आगळावेगळा उपक्रम राबविणे शक्य झाले आहे.

**शासन परिपत्रक :-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून शासन सदर परिपत्रकान्वये पुढील प्रमाणे सूचना देत आहे:

**सन २०१९ या वर्षासाठी महानगरपालिका, नगरपालिका व नगरपंचायत क्षेत्रात वृक्ष लागवडीबाबत जिल्हानिहाय उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. सदर जिल्हानिहाय उद्दिष्टे या परिपत्रासोबत जोडलेल्या विवरणपत्र-अ मध्ये नमूद करण्यात आले आहे. त्याप्रमाणे वृक्ष लागवड करणेबाबत संबधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपालिका यांनी दक्षता घ्यावी.**

२. राज्यातील निरनिराळया विभागामध्ये पावसाची सुरूवात आणि आवक सर्वसाधारणपणे १५ जून नंतर वेगवेगळया वेळी होते. त्यामुळे पावसाचा अंदाज घेवून जिल्हानिहाय दिलेली उद्दिष्टे पूर्ण करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

३ . सदर कार्यक्रम यशस्वीरित्या राबविण्यासंदर्भात पुढील प्रमाणे निदेश देण्यात येत आहेत:-

१) सदर कार्यक्रमाचे नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण व समन्वय या करिता खालील प्रमाणे नोडल अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| अ) विभागीय स्तर | : | प्रादेशिक उप संचालक, नगरपरिषद शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय. (सर्व) |
| ब) जिल्हास्तर | : | जिल्हा प्रशासन अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी (नपा शाखा) जिल्हाधिकारी कार्यालय |
| क) नागरी स्थानिक स्वराज्य संस्था स्तर | : | महानगरपालिका-संबंधित अति. आयुक्त/उप आयुक्त, नगरपालिका संबंधित मुख्याधिकारी |

(२) जिल्हा प्रशासन अधिकारी/जिल्हा प्रकल्प अधिकारी (नपा शाखा), जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व) यांनी विवरणपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या उद्दिष्टांची जिल्ह्यातंर्गत येणाऱ्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना उदिष्ट पूर्तता करण्यास सहकार्य करावे. तसेच, वेळोवेळी उदिष्ट पूर्ततेचा अहवाल शासनास सादर करावा.

(३) प्रत्येक स्थळाविषयी सूक्ष्म नियोजन, करणे योग्य रोपांची उपलब्धता, मनुष्यबळाची निश्चिती, वृक्ष लागवडीच्या काळात दरदिवशी घेणाऱ्या वृक्षारोपणाचा आराखडा तयार करणे. तसेच, स्थळनिहाय वृक्ष लागवडीसाठी एका जबाबदार अधिकारी/कर्मचारी यांची नेमणूक करण्यात यावी. स्थळ निश्चितीची माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर, सचिव (वने) आणि या विभागाकडे Geo-tagging या संगणकीय प्रणालीद्वारे अक्षांश-रेखांशासह (Latitude-Longitude) व शक्य तिथे GPS Location सह वेळोवेळी पाठविण्यात यावी.

(४) वृक्षलागवडीच्या कार्यक्रमातंर्गत पूर्व पावसाळी कामे विहित कालावधीत पार पाडण्यासाठी नियोजन करावे. प्रचलित निकषाप्रमाणे खड्डे तयार करणे, माती, खत, किटकनाशके इ. भरून

सदर खड्डे रोप लागवडीसाठी तयार ठेवणे ही कामे प्रत्येक वर्षी दिनांक ३१ मार्च पर्यंत पूर्ण करण्यात यावीत.

(५) वृक्षलागवडीच्या स्थळांवर जवळच्या कोणत्याही रोपवाटीकेमधून रोपे वाहतूकीसंबंधी, वाहतूक नियोजन आराखडा (Transport Plan ) तयार करावा.

(६) शहरांच्या विविध भागांमध्ये हरित पट्टे निर्माण करून त्यातून जैवविविधता उद्याने विकसित करण्याबाबत नियोजन करावे. अशा उद्यानांमध्ये आपल्या प्रिय व्यक्तीच्या आठवणी जपण्यासाठी स्मृतीवन, आयुष्यामध्ये वेगवेगळ्या क्षेत्रात यश संपादन केल्याच्या प्रित्यर्थ यशवन, आपली लाडकी लेक लग्न होऊन माहेरला जात असताना तिच्या आठवणी हृदयात जपून ठेवण्यासाठी लावण्यात येणारी माहेरची झाडी, वटसावित्री सणाच्या निमित्ताने लावण्यात येणाऱ्या वडांच्या झाडांचे वड सावित्री वन, २४ तास ऑक्सिजन देणारे पिंपळ वन, अन्न, वस्त्र व निवारा या सर्व घटकांची पुर्तता करणारा कल्पवृक्ष म्हणून ज्याला नावाजले जाते अशा बांबू वृक्षांच्या विविध प्रजातींचा समावेश असलले व त्याची माहिती जनतेला उपलब्ध करन देणारे बांबू वन, जास्तीत जास्त तास ऑक्सिजन देणाऱ्याय वड सदृश्य वृक्ष प्रजातींचा समावेश असलेले ऑक्सिजन पार्क, त्रिमुर्ती वन (वड, पिंपळ आणि निम), फळ फळावळ देणाऱ्या व त्यातून नैसर्गिक अन्न साखळी टिकविणाऱ्या व पशपक्षांना अधिवास देणाऱ्या वृक्ष प्रजातींची वने, फुलपाखरु वन, चिंच वन, बेल वन, सिताफळ वन, देश आंब्यांचे वन, २७ नक्षत्रांचे प्रतिनिधित्व करणारे २७ वृक्षांचा समावेश असलेले नक्षत्र वन इत्यादींचा समावेश करता येईल. या व्यतिरिक्त इतरही वन विकसित करण्यासाठी स्थानिक स्तरावर निर्णय घेता यईल.

उदा.-

i. प्रदूषण नियंत्रणासाठी- वड, पिंपळ, तामन, आंबा, शिसम, अगस्ती, चिंच, फणस, बेल, सप्तपर्णी, काशीद, सोनमोहर, चाफा इ.
ii. शहर सौंदर्यीकरणासाठी- शिरीष, पळस, बहावा, कैलासपती, अनंत, आकाशनिम, बकुळ, पारिजातक, अशोक इ.
iii. जल संवर्धनासाठी- बांबू, गिरिपुष्प, बोर, डूरंगी, पिपळी इ.
iv. सावलीसाठी- वड, पिंपळ, महुवा, कुसुम, जांभूळ, बेहडा, फणस, आंबा इ.
v. फळफळावळीसाठी- आंबा, आवळा, चिंच इ.

(७) या कार्यक्रमासाठी वन आणि सामाजिक वनीकरण योजनांतर्गत, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (मजीनरेगा/ MNREGA), रोजगार हमी योजना, वनमहोत्सव आणि कॅम्पांतर्गत तयार करण्यात आलेल्या रोपवाटीकांमधून पुरेशा संख्येत व पुरेशा उंचीची, दर्जेदार, गुणवत्तापूर्ण आणि सुदृढ रोपे उपलब्ध करून घ्यावीत. त्याचबरोबर, कृषी विभाग, नियोजन विभाग (रोजगार हमी योजना) व आवश्यक वाटल्यास इतर विभागाकडील रोपवाटीकांमधून रोपांची उपलब्धता करून घ्यावी. रोपांच्या उपलब्धतेबाबत वन विभागांतर्गत प्रत्येक जिल्ह्यातील उपसंचालक, सामाजिक वनीकरण आणि तालुका स्तरावर लागवड

अधिकारी यांची "नोडल अधिकारी" म्हणून नेमणूक करण्यात आलेली आहे. आवश्यकतेनुसार त्यांचे आणि स्थानिक स्तरावर वन व सामाजिक वनीकरण विभागाचे अधिकारी आणि कर्मचारी यांचे मार्गदर्शन व सल्ला घ्यावा.

८) वृक्ष लागवडीच्या काळात वन व सामाजिक वनीकरण विभागातंर्गत वर नमूद रोपवाटिकामधून सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा केला जातो. या योजनेचा लाभ घेण्यात यावा. जेथे शक्य असेल तेथे उद्योजकता सामाजिक दायित्व (CSR) माध्यमातून रोपांची खरेदी करण्यात यावी. तसेच वृक्ष लागवड करावयाची स्थळे विचारात घेवून, त्यानुसार जिल्हा किंवा तालुका स्तरावरील सामाजिक वनीकरण विभागांतर्गत लागवड अधिकारी (वनक्षेत्रपाल) किंवा जिल्हा स्तरावरील उपसंचालक, सामाजिक वनीकरण (विभागीय वन अधिकारी) यांच्याकडे रोपांची मागणी नोंदवावी.

९) वृक्षलागवडीच्या कार्यक्रमांतर्गत निश्चित केलेल्या स्थळांच्या ठिकाणी ठरवून दिलेल्या उद्दिष्टांप्रमाणे मजुरांची निश्चिती करुन रोपे लागवडीच्या दिवशी पुरेसे मजूर उपलब्ध होतील, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

१०) सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची यंत्रणा तसेच खाजगी व अशासकीय संस्था इत्यादीचा सहभाग घेण्यात यावा.

११) या शिवाय शालेय/महाविद्यालयीन विद्यार्थी, नागरिक, स्वयंसेवक आणि वर नमूद अशासकीय संस्था इ. सर्वांनी वृक्ष लागवड स्थळांवर वृक्षारोपणास उपस्थित राहण्यासाठी आवश्यक ते नियोजन करावे. तसेच, महानगरपालिका/नगरपरिषदांनी ५ जून (पर्यावरण दिन) पासून जनजागृती कार्यक्रम, शालेय विद्यार्थ्यांच्या स्पर्धा, वृक्ष दिंडी असे उपक्रम राबवावेत.

१२) मा. पालक मंत्री, स्थानिक आमदार, खासदार व इतर लोकप्रतिनिधी, प्रतिष्ठित व्यक्ती, स्थानिक स्वराज्य संस्थांचे पदाधिकारी यांचे मार्गदर्शन घेवून जेथे शक्य असेल तेथे त्यांच्या हस्ते वृक्षारोपन करण्यात यावे.

१३) वृक्षारोपणाच्या दिवशी जसजसे वृक्ष लागवड होईल त्या संदर्भातील माहिती (शक्य असल्यास छायाचित्रांसह) वेळोवेळी वन विभागाच्या www.mahaforest.nic.in या संगणक प्रणालीवर अपलोड करावी. यामध्ये किती वृक्षांची लागवड करण्यात आली, कोणत्या व्यक्तींनी/संस्थांनी तसेच कोणत्या प्रजातीच्या वृक्षांची लागवड केली याबाबतची माहिती त्यात अंतर्भूत असावी. (Real Time Data Capture). त्याच प्रमाणे नगर विकास विभागाच्या संकेत स्थळावर सदर माहिती नियमित पणे अपलोड करण्यात यावी.

४. वृक्षारोपणाचा दृश्य परिणाम दिसून येण्यासाठी, संवर्धन, पाणीपुरवठा, जनावरांपासून रोपांचे संरक्षणासाठी जैविक किंवा तारांचे/प्लॅस्टीक कुंपण, कायम स्वरुपी देखभाल, निगा, जोपासना व संगोपन इत्यादी कामांचा नियोजन आराखडा तयार करावा व त्यानुसार कार्यवाही व्हावी. तसेच, या वृक्षांचे जिवंत राहण्याचे प्रमाण (Survival rate) जास्तीत जास्त राहणेबाबत काळजी घ्यावी.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१६१५४५५५०१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
Date: 2019.02.16 15:57:02 +05'30'

(अजित पालवे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. मुख्य सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्याचे अप्पर मुख्य सचिव.
३. सर्व प्रशासकीय विभागांचे अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (उत्पादन व व्यवस्थापन), व ५० कोटी वृक्ष लागवड कार्यक्रमाचे नोडल अधिकारी, नागपूर.
८. सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय), सामाजिक वनीकरण, पूणे.
१२.सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक.
१३.सर्व विभागीय आयुक्त.
१४.सर्व जिल्हाधिकारी.
१५.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१६.सर्व आयुक्त, महानगरपालिका
१७.सर्व प्रशासकीय विभागांतर्गत विभाग प्रमुख.
१८.सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक).
१९.सर्व प्रकल्प संचालक व मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव).
२०.सर्व वनसंरक्षक,सामाजिक वनीकरण.
२१.सर्व उप वनसंरक्षक (प्रादेशिक).
२२.सर्व मुख्याधिकारी, अ वर्ग नगरपरिषद.
२३.सर्व विभागीय वनाधिकारी, सामाजिक वनीकरण.

शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.२२१/नवि-३४, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१९ चे विवरणपत्र-अ

## औरंगाबाद विभाग

| जिल्हा | औरंगाबाद | | | जालना | | | बीड | | | परभणी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण |
| म न पा | १ | १००६५० | १००६५० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | ७००० | ७००० |
| अ वर्ग | ० | ० | ० | १ | १३१०० | १३१०० | १ | १३१०० | १३१०० | ० | ० | ० |
| ब वर्ग | ४ | १३२७५ | ५३१०० | ० | ० | ० | ३ | १७७५० | ५३२५० | ३ | ३५०० | १०५०० |
| क वर्ग | ४ | १३२७५ | ५३१०० | ७ | १२००० | ८४००० | ७ | १२००० | ८४००० | ५ | १४९० | ७४५० |

| जिल्हा | हिंगोली | | | लातूर | | | उस्मानाबाद | | | नांदेड | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण |
| म न पा | ० | ० | ० | १ | १००००० | १००००० | ० | ० | ० | १ | १०००० | १०००० |
| अ वर्ग | ० | ० | ० | १ | ३५००० | ३५००० | १ | ५०००० | ५०००० | ० | ० | ० |
| ब वर्ग | २ | ७५०० | १५००० | १ | ३५००० | ३५००० | ० | ० | ० | १ | ४००० | ४००० |
| क वर्ग | ३ | ५००० | १५००० | ७ | १४५०७ | १०१५५० | ९ | ४२७१७ | ३८४४५० | १५ | ३४०० | ५१००० |

शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.२२१/नवि-३४, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१९ चे विवरणपत्र-अ

## नागपूर विभाग

| जिल्हा | नागपूर | | | वर्धा | | | गोंदिया | | | चंद्रपूर | | | गडचिरोली | | | भंडारा | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण |
| म न पा | १ | २५५० | २५५० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | १००००० | १००००० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| अ वर्ग | ० | ० | ० | २ | १०५०० | २१००० | १ | ४७०० | ४७०० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| ब वर्ग | ४ | १५५० | ६२०० | १ | १०००० | १०००० | ० | ० | ० | ३ | ५४१०० | १६२३०० | १ | ८०० | ८०० | २ | ३०७५ | ६१५० |
| क वर्ग | १५ | १००० | १५००० | ७ | ९००० | ६३००० | ६ | २८०० | १६८०० | १२ | १८००८ | २१६१०० | ११ | ४५० | ४९५० | ५ | २००० | १०००० |

.

## अमरावती विभाग

| जिल्हा | अमरावती | | | अकोला | | | वाशिम | | | यवतमाळ | | | बुलढाणा | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण |
| म न पा | १ | १५००० | १५००० | १ | ३०००० | ३०००० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| अ वर्ग | १ | ७५०० | ७५०० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | १५००० | १५००० | ० | ० | ० |
| ब वर्ग | २ | ४३०० | ८६०० | ३ | १२००० | ३६००० | २ | ७६७५ | १५३५० | ४ | ७५०० | ३०००० | ७ | १२८९३ | ९०२५० |
| क वर्ग | ११ | ३००० | ३३००० | ३ | ७५०० | २२५०० | ४ | ४८७५ | १९५०० | ११ | ५८६८ | ६४५५० | ६ | ८१०० | ४८६०० |

शासन परिपत्रक क्रमांकः- संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.२२१/नवि-३४, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१९ चे विवरणपत्र-अ

| नाशिक विभाग | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जिल्हा | नाशिक | | | अहमदनगर | | | धुळे | | | जळगांव | | | नंदूरबार | | |
| | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण |
| म न पा | २ | ६०००० | १२०००० | १ | ७०००० | ७०००० | १ | १००००० | १००००० | १ | ५०००० | ५०००० | ० | ० | ० |
| अ वर्ग | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | १२००० | १२००० | १ | १५५० | १५५० |
| ब वर्ग | ३ | ७००० | २१००० | ३ | १२००० | ३६००० | २ | ११०७५ | २२१५० | ५ | ५००० | २५००० | १ | १५०० | १५०० |
| क वर्ग | १२ | २५२५ | ३०३०० | १२ | ६८९६ | ८२७५० | २ | ११०७५ | २२१५० | १० | ४५५० | ४५५०० | ३ | ८५० | २५५० |

| कोकण विभाग | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जिल्हा | रत्नागिरी | | | सिंधुदूर्ग | | | ठाणे | | | रायगड | | | पालघर | | |
| | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण |
| म न पा | ० | ० | ० | ० | ० | ० | ६ | ३३९६७ | २०३८०० | १ | १५००० | १५००० | १ | १००००० | १००००० |
| अ वर्ग | ० | ० | ० | ० | ० | ० | २ | १७००० | ३४००० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| ब वर्ग | २ | ७७५० | १५५०० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | ५००० | ५००० | २ | ३२००० | ६४००० |
| क वर्ग | ७ | ४५०० | ३१५०० | ८ | १४०६ | ११२५० | २ | १४००० | २८००० | १४ | २८३२ | ३९६५० | ४ | ११५५० | ४६२०० |

शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.२२१/नवि-३४, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१९ चे विवरणपत्र-अ

| पुणे विभाग | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जिल्हा | पुणे | | | सोलापूर | | | सातारा | | | सांगली | | | कोल्हापूर | | |
| | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण | मनपा/ नपा संख्या | प्रति मनपा/ नपा | एकूण |
| म न पा | २ | ६०००० | १२०००० | १ | १०००० | १०००० | ० | ० | ० | १ | १३०००० | १३०००० | १ | ५०००० | ५०००० |
| अ वर्ग | २ | २०००० | ४०००० | १ | ३००० | ३००० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ | १०००० | १०००० |
| ब वर्ग | ३ | १६००० | ४८००० | २ | १७०० | ३४०० | २ | १५०० | ३००० | २ | २०००० | ४०००० | १ | १०००० | १०००० |
| क वर्ग | ९ | १४९५६ | १३४६०० | ९ | १६८३ | १५१५० | १३ | १३३५ | १७३५० | ८ | १६०३८ | १२८३०० | ७ | ५५०० | ३८५०० |